आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांना वैद्यकीय सहाय्य
जीवनदायी आरोग्य योजना

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक जिआयो 1097/प्र.क्र.247/आरोग्य-3,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 6 नोव्हेंबर 1997.

**निर्णय** :- निरनिराळ्या गंभीर आजारांनी ग्रस्त होणा-या व आवश्यक त्या औषधोपचाराविना मृत्युमुखी पडणा-या रुग्णांची संख्या सतत वाढत आहे. विशेषत: आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील लोकांना या आजारावरील अतिखर्चिक उपचार करता येणे ही त्यांच्या कल्पनेबाहेरची बाब आहे. खेड्यापाड्यात, दुर्गम भागात राहणा-या ग्रामीण व विशेषत: दारिद्र्यरेषेखालील लोकांचा वैद्यकीय उपचाराचा शोध प्राथमिक आरोग्य केंद्रापासून सुरु होऊन तो जिल्हा रुग्णालयापर्यंत पोहचतो व तेथेच संपतो. खाजगी व अद्ययावत वैद्यकीय सुविधा असणा-या रुग्णालयात या आजारावर उपलब्ध असणा-या महागड्या औषधोपचाराची उपलब्धता काही शासकीय व महानगरपालिकांच्या रुग्णालयांव्यतिरिक्त केवळ मुंबई/पुणे यासारख्या हाताच्या बोटावर मोजता येण्या-या महानगरपालिका क्षेत्रात असणा-या खाजगी रुग्णालयात असल्याने या रुग्णालयात उपलब्ध असणा-या अतिखर्चिक बाबींचा हे रुग्ण विचारही करु शकत नाहीत ही बाब विचारात घेऊन आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील दारिद्र्यरेषेखालील रुग्णांना हृदयविकार, मूत्रपिंडविकार, मेंदू आणि मज्जासंस्था विकार यांसारख्या गंभीर आजारावरील शस्त्रक्रिया शासकीय/महानगरपालिका रुग्णालयांत तसेच खाजगी रुग्णालयात मोफत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

2. त्यानुसार हृदयशस्त्रक्रिया, मूत्रपिंडरोपण शस्त्रक्रिया व मेंदू व मज्जासंस्था विकार यांवरील शस्त्रक्रियांच्या सुविधा ज्या शासकीय/महानगरपालिका रुग्णालयात तसेच खाजगी रुग्णालयात उपलब्ध आहेत तेथे त्या महाराष्ट्र राज्यातील दारिद्र्यरेषेखालील रहिवाश्यांना मोफत करण्यास शासन या निर्णयाद्वारे मंजुरी देत आहे व त्यासाठी उपरोक्त आजारांवर करण्यात येणा-या शस्त्रक्रियांच्या खर्चावरील साधनसामुग्री (डिस्पोजेबल्स) व आवश्यक तेथे जीवनावश्यक (लाईफ सेव्हींग) किंमती औषधे यावरील खर्च भागविण्यासाठी परिच्छेद 4 मध्ये नमूद केल्याप्रमाणे आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या रुपये 1,00,000,00/- (रुपये एक कोटी) इतक्या अग्रिमाच्या रकमेतून भागविण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

3. या योजनेंतर्गत मोफत वैद्यकीय मदत देण्याबाबतचे नियम व अवलंबावयाची कार्यपध्दत "प्रपत्र अ" नुसार सोबत जोडली आहे.

4. यावरील खर्च "2210-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, 01-नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा, 110-रुग्णालये व दवाखाने, 110-7 पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, 110-7(21) आर्थिक दुर्बल घटकांना वैद्यकीय मदत" या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा. तसेच या योजनेवर ऑक्टोबर ते डिसेंबर 1997 पर्यंत होणारा खर्च, वित्त विभाग, ज्ञापन क्र.आकनि 1197/073/अर्थसंकल्प-8, दिनांक 5 नोव्हेंबर 1997 अन्वये मंजूर करण्यात आलेल्या रु.1,00,00,000/- (रुपये एक कोटी फक्त) इतक्या आकस्मिकता निधीतील अग्रिमातून भागविण्यात यावा. या वर्षाच्या उर्वरीत कालावधीसाठी होणारा खर्च भागविण्याच्या संदर्भात आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. आकस्मिकता निधीतून वर नमूद केल्याप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम, संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

5. आकस्मिकता अग्रिमान्वये मंजूर झालेली रक्कम खर्च करताना वित्त विभाग, परिपत्रक क्र.सीएनएफ 1083/अर्थसंकल्प-3, दिनांक 26 एप्रिल 1983 व वित्त विभाग, परिपत्रक क्र.सीएनएफ 1086/152/अर्थसंकल्प-3, दिनांक 28 ऑगस्ट 1986 अन्वये विहित केलेल्या सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल, याची दक्षता संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी घ्यावी.

6 वित्त विभागाच्या दिनांक 28 ऑगस्ट 1986 च्या परिपत्रकाच्या परिच्छेद-2(1) नुसार संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-यांकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या

आदेशात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर "आकस्मिकता निधी अग्रिम, शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्र.आकनि-1197/073/अर्थसंकल्प-8, दिनांक 5 नोव्हेंबर 1997 अन्वये मंजूर" असे लाल शाईने लिहावे व देयकावर "800 0731" असा संगणक क्रमांक न चुकता नमूद करावा व अशी स्पष्ट सूचना त्या आदेशात अंतर्भूत करावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करण्यात यावी.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.915/97/व्यय-13, दिनांक 16 ऑक्टोबर 1997 अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा. गो. बढे,
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा, मुंबई (कक्ष-3) (कक्ष-5)
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
सहसंचालक (वैद्यकीय), आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य), पुणे
उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई
अधिष्ठाता, ग्रँन्ट वैद्यकीय महाविद्यालय व ज.जी. रुग्णालय समूह, भायखळा, मुंबई
अधीक्षक, औंध उरो रुग्णालय, औंध, पुणे
अधिष्ठाता, जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय व के.ई.एम. रुग्णालय, परेल, मुंबई 400 012
अधिष्ठाता, टी.एन. वैद्यकीय महाविद्यालय व नायर रुग्णालय, मुंबई 400 008
अधिष्ठाता, लोकमान्य टिळक वैद्यकीय महाविद्यालय व शीव रुग्णालय, शीव, मुंबई 400 022
महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, 5 वा मजला, मुंबई (5 प्रती)
मंत्रालयातील सर्व विभाग
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय 13) (अर्थसंकल्प 8) ( अर्थसंकल्प 3) मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य मंत्री यांचे सचिवालय, मुंबई 400 032
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
मा. आरोग्य मंत्री यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
संबंधित खाजगी रुग्णालये (आरोग्य सेवा संचालनालयामार्फत - 50 प्रतींसह)
निवड नस्ती (आरोग्य-3).

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक - जीआयो 1097/प्र.क्र.247/आरोग्य-3, दिनांक 6 नोव्हेंबर 1997 चे सहपत्र

प्र प त्र - अ

जीवनदायी आरोग्य योजनेंतर्गत मोफत वैद्यकीय मदत देण्याबाबतचे

नियम व कार्यपध्दती

या योजनेला जीवनदायी आरोग्य योजना, 1997 असे म्हणण्यात येईल व ती संपूर्ण महाराष्ट्रातील दारिद्र्यरेषेखालील रहिवाशांना दिनांक 11 ऑक्टोबर 1997 पासून लागू होईल.

2. दारिद्र्यरेषेखालील महाराष्ट्रातील रहिवासी याचा अर्थ महाराष्ट्र शासनाने सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत ज्या कुटुंबांना पिवळी शिधा पत्रिका वितरीत केलेली असेल त्या कुटुंबातील व्यक्तींना अथवा अन्य प्रकारे त्याची व्याख्या ठरविली असेल अशा कुटुंबातील व्यक्तींना असा आहे. पिवळ्या शिधा पत्रिकेचे वाटप अंमलात येईपर्यंत रुग्णाचे सर्वसाधारण निवासस्थान असलेल्या तालुक्याच्या तालुका दंडाधिकारी/तहसिलदार यांनी संबंधित व्यक्ती दारिद्र्यरेषेखाली असल्याबाबतचे दिलेले प्रमाणपत्र ग्राह्य मानण्यात येईल.

3. या योजनेंतर्गत सुरुवातीला हृदयरोग, मूत्रपिंड विकार, मेंदू व मज्जासंस्था विकार या गंभीर रोगांवरील शस्त्रक्रिया/उपचार मोफत करण्यात येतील. तसेच विशिष्ट परिस्थितीत या गंभीर रोगावरील निदानात्मक चाचण्या व जीवनावश्यक अतिकिंमती औषधे मोफत देण्याचा विचार करण्यात येईल.

4. वर नमूद केलेल्या आजारावरील शस्त्रक्रिया उपचार फक्त शासकीय/महानगरपालिका रुग्णालये व शासन निर्देशित खाजगी ट्रस्ट रुग्णालयात करण्यात येतील. या योजनेनुसार सक्षम प्राधिकारी समितीने ठरविलेल्या रुग्णालयांतच त्या रुग्णावर मोफत उपचार करण्यांत येतील.

5. मोफत वैद्यकीय उपचारासाठी करण्यांत येणा-या विनंतीची व रुग्णाची प्राथमिक तपासणी संबंधित जिल्ह्याचे जिल्हा शल्यचिकित्सक व जिल्हा सामान्य रुग्णालयातील विशेषज्ञ करतील. अशा निदानात्मक तपासणीसाठी जिल्हा सामान्य रुग्णालयांत आवश्यक ती सुविधा उपलब्ध नसल्यास जिल्हा शल्य चिकित्सक त्या रुग्णास जिल्हा स्तरावरील खाजगी किंवा शासन सहाय्यित स्वयंसेवी संस्थेने चालविलेल्या रुग्णालयांतच संदर्भित करतील.

6. जिल्हा शल्य चिकित्सकांकडून प्राथमिक तपासणी करुन वर नमूद केलेल्या आजारावरील मोफत शस्त्रक्रिया/उपचारांसाठी पात्र ठरविलेल्या रुग्णांना विभागीय स्तरावर स्थापन करण्यात आलेल्या सक्षम प्राधिकारी समितीकडे कुठल्या रुग्णालयांत मोफत शस्त्रक्रियेसाठी/उपचारासाठी पाठविण्यात यावे हे ठरविण्यासाठी पाठविण्यांत येईल. काही प्रकरणी रुग्ण थेट सक्षम प्राधिकारी समितीकडे किंवा शासकीय/महानगरपालिका रुग्णालयाकडे किंवा शासन निर्देशित खाजगी रुग्णालयाकडे तो रुग्ण दारिद्र्यरेषेखाली असल्याच्या विहित पुराव्यासह शस्त्रक्रियेसाठी/उपचारासाठी जाऊ शकेल. सक्षम प्राधिकारी समिती वा रुग्णालयाकडे थेट येणा-या रुग्णांवर उपचाराची व्यवस्था करण्याची मुभा असेल.

7. जिल्हा शल्य चिकित्सकांनी प्राथमिक तपासणीअंती योग्य ठरविलेल्या रुग्णांची मोफत शस्त्रक्रिया/उपचारासाठी पुढील पात्रता ठरविण्यासाठी राज्यांत मुंबई, पुणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक व अकोला येथे विभागीय सक्षम प्राधिकारी समित्या स्थापन करण्यात येतील. या सक्षम प्राधिकारी समितीत खालील सदस्यांचा अंतर्भाव राहील.

मुंबई

(1) अधिष्ठाता, ग्रँन्ट मेडिकल कॉलेज व ज.जी. रुग्णालय किंवा त्यांनी निर्देशित केलेला अधिकारी.

(2) संबंधित शस्त्रक्रियेतील तज्ञ प्राध्यापक

(3) अधिष्ठाता, जी.एस. मेडिकल कॉलेज, परेल मुंबई किंवा त्यांनी निर्देशित केलेला अधिकारी

(4) लिलावती रुग्णालयाचा प्रतिनिधी

| | | |
|---|---|---|
| पुणे | (1) | अधिष्ठाता, बी.जे.मेडिकल कॉलेज व ससून रुग्णालय, पुणे किंवा त्यांनी निर्देशित केलेला अधिकारी |
| | (2) | वैद्यकीय अधीक्षक, पुणे उरो रुग्णालय |
| | (3) | रुबी हॉल क्लिनिक (खाजगी रुग्णालय) चा प्रतिनिधी |
| | (4) | प्राध्यापक, मेडिसीन विभाग, बी.जे.मेडिकल कॉलेज, पुणे |
| नागपूर | (1) | अधिष्ठाता, नागपूर वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर किंवा त्यांनी निर्देशित केलेला अधिकारी |
| | (2) | पी.जी.आय. नागपूर मधील संबंधित विषयातील तज्ज्ञ अधिकारी |
| | (3) | खाजगी रुग्णालयाचा प्रतिनिधी (असल्यास) |
| | (4) | जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर |
| औरंगाबाद | (1) | अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय किंवा त्यांनी निर्देशित केलेला अधिकारी. |
| | (2) | प्राध्यापक, मेडिसीन विभाग, वैद्यकीय महाविद्यालय, औरंगाबाद |
| | (3) | खाजगी रुग्णालयाचा प्रतिनिधी (असल्यास) |
| | (4) | जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद |
| नाशिक | (1) | जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, नाशिक |
| | (2) | वरिष्ठ फिजिशियन, जिल्हा सामान्य रुग्णालय, नाशिक |
| | (3) | खाजगी रुग्णालयाचा प्रतिनिधी (असल्यास) |
| अकोला | (1) | जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय, अकोला |
| | (2) | वरिष्ठ फिजिशियन, जिल्हा सामान्य रुग्णालय, अकोला |
| | (3) | खाजगी रुग्णालयाचे प्रतिनिधी (असल्यास) |

8. जिल्हा स्तरीय प्राथमिक तपासणी समितीने विभागीय सक्षम प्राधिकारी समितीकडे संदर्भित केलेल्या रुग्णांना विभागीय सक्षम प्राधिकारी समितीने संदर्भित करावयाच्या रुग्णालयांची विभागणी खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र. | महसूल विभागीय समिती | संदर्भ करावयाच्या रुग्णालयांची नावे |
|---|---|---|
| 1. | मुंबई | के.ई.एम. रुग्णालय, मुंबई |
| | | लोकमान्य टिळक रुग्णालय, शीव, मुंबई |
| | | टी.एन. वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई |
| | | ज.जी.समूह रुग्णालय, मुंबई |
| | | बॉम्बे हॉस्पिटल, मुंबई |
| | | हिंदुजा हॉस्पिटल, माहीम, मुंबई |
| | | लिलावती हॉस्पिटल, बांद्रा, मुंबई |
| | | हरकिसनदास हॉस्पिटल, गिरगाव, मुंबई |
| | | ब्रीच कँडी हॉस्पिटल, मुंबई |
| 2 | पुणे | उरो रुग्णालय, पुणे |
| | | बी.जे.मेडिकल कॉलेज, पुणे |
| | | रुबी हॉस्पिटल क्लिनिक, पुणे |
| | | के.ई.एम.हॉस्पिटल, पुणे |
| | | जहांगिर नर्सिंग होम, पुणे |
| | | वानलेस हॉस्पिटल, मिरज, सांगली |

| | | |
|---|---|---|
| 3 | नागपूर | पी.जी.आय. नागपूर<br>नागपूर वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर |
| 4 | औरंगाबाद | लोकमान्य टिळक रुग्णालय, शीव, मुंबई<br>जसलोक हॉस्पिटल, मुंबई<br>ज.जी.समूह रुग्णालय, मुंबई |
| 5 | नाशिक | टी.एन.वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालय, मुंबई<br>हिंदुजा रुग्णालय, मुंबई |
| 6 | अकोला | के.ई.एम.रुग्णालय, मुंबई<br>[illegible] हॉस्पिटल, मुंबई<br>कंबाला हिल रुग्णालय, मुंबई |

9. अनुक्रमांक 7 येथे नमूद केलेली सक्षम प्राधिकारी समितीकडून जिल्हा शल्य चिकित्सकांनी संदर्भित केलेली प्रकरणे किंवा त्यांच्याकडे थेट प्राप्त झालेली प्रकरणे छाननीअंती शस्त्रक्रियेसाठी/उपचारासाठी योग्य आढळल्यास त्या रुग्णाला शक्यतो वर 8 येथे नमूद केलेल्या रुग्णालयांना मोफत शस्त्रक्रियांसाठी उपचारांसाठी पाठविण्यात येईल. या समितीने निर्देशित केलेल्या रुग्णालयास शस्त्रक्रियेसाठी संदर्भित केलेल्या रुग्णांचा पाठपुराव्याबाबत तपशील ठेवणे आवश्यक राहील.

10. सक्षम प्राधिकारी समितीने पाठविलेल्या रुग्णांवर किंवा अपरिहार्य व रुग्णाच्या जिवीतास धोका असलेल्या परिस्थितीत एखाद्या रुग्णाने थेट शासकीय/महानगरपालिका/शासन निर्देशित रुग्णालयाकडे शस्त्रक्रियेसाठी/उपचारासाठी थेट संपर्क साधल्यास त्याच्यावर आवश्यक ते उपचार करण्यास संबंधित रुग्णालयास मुभा राहील. तथापि अशा रुग्णाची आवश्यक ती माहिती सक्षम प्राधिकारी समितीस त्वरित देणे संबंधित रुग्णालयास बंधनकारक राहील.

11. सक्षम प्राधिकारी समितीने शस्त्रक्रियेसाठी/उपचारासाठी संदर्भित केलेल्या रुग्णावर आवश्यक ती शस्त्रक्रिया शक्यतो लवकर व आवश्यकतेनुसार तत्काळ करणे त्याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सक्षम प्राधिकारी समितीकडे त्वरित पाठविणे संबंधित रुग्णालयावर बंधनकारक राहील.

12. अशा मोफत शस्त्रक्रिया/उपचार केलेल्या रुग्णांवर करण्यात आलेल्या रुग्णावर झालेल्या खर्चाची संपूर्ण प्रतिपूर्ती प्रत्येक प्रकरणी जास्तीत जास्त रु.50,000/- च्या मर्यादेत शासनाकडून करण्यात येईल.

13. ही प्रतिपूर्ती साधनसामुग्री औषधे पुरविणे याद्वारे करण्यात येईल. तथापि याबाबतची कार्यपध्दती निश्चित करेपर्यंत ही प्रतिपूर्ती प्रत्यक्ष खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या स्वरुपात करण्यात येईल.

14. यासाठी प्रत्येक शासकीय/महानगरपालिका/शासन निर्देशित रुग्णालयात प्रत्येकी रु.2.50 लाख इतकी रक्कम अग्रिम स्वरुपात देण्यात येईल. या अग्रिमाच्या मर्यादेत आवश्यक तेवढ्या शस्त्रक्रिया झाल्यावर त्याचा हिशोब प्रत्येक रुग्णालयास संबंधित सक्षम प्राधिकारी समितीकडे सादर करुन पुढील रु.2.50 लाख इतक्या रकमेची मागणी करु शकेल व सक्षम प्राधिकारी समिती त्या रुग्णालयाने पूर्वी केलेल्या शस्त्रक्रिया/उपचार प्रकरणाची योग्यता पाहून हे पुढील अग्रिम देऊ शकेल. अशा प्रकारचे अग्रिम देण्यासाठी प्रत्येक सक्षम प्राधिकारी समितीकडे त्यांच्या क्षेत्रात होणा-या मोफत शस्त्रक्रियांचा अंदाज घेऊन आवश्यक तेवढी रक्कम त्यांच्याकडे संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडून देण्यात येईल. मार्गदर्शक तत्व क्र.5 मध्ये नमूद केल्याप्रमाणे जिल्हा शल्य चिकित्सकांनी निदानात्मक चाचण्यासाठी खाजगी रुग्णालयांतून केलेल्या खर्चाची प्रतिपूर्तीही या रकमेतून विभागीय सक्षम प्राधिकारी समितीकडून करण्यात येईल.

15. या मोफत शस्त्रक्रियांसाठी दिलेल्या रकमांचा किंवा साधनसामग्री (Disposable) व औषधांचा योग्य तो हिशोब ठेवण्याचे बंधन संबंधित रुग्णालयांवर/सक्षम प्राधिकारी समितीवर राहील.

--------